## १४.४.३ सुक्ष्म, लघू आणि मध्यम उद्योग युनिट्सना इतर वित्तीय प्रोत्साहन (MSME)

| | **A** | **B** | **C** | **STZ/STD** |
|---|---|---|---|---|
| **Eligibility Period (in years)** | **05** | **05** | **07** | **07** |
| SGST reimbursement | 50% of SGST of on net paid | 75% of SGST of of on net paid | 100% of SGST of on net paid | 100% of SGST ofof on net paid |
| Electricity duty Exemption | 50% | 75% | 100% | 100% |
| Electricity Tariff refund (Difference between commercial tariff & industrial tariff) | 50% | 75% | 100% | 100% |
| Interest subventions | Up to **5%**Interest subventions on Loan of up to **INR 5 Crore.** Ceiling on total interest subventions shall be **INR 20Lakhs** within thegiven eligibility period | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 10 Crore.** Ceiling on total interest subventions shallbe **INR 25 Lakhs** within the given eligibility period | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 15 Crore.** Ceiling on total interest subventions shallbe **INR 50 Lakhs** within the given eligibility period | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 20 Crore.** Ceiling on total interest subventions shallbe **INR 50 Lakhs** within the given eligibility period |
| Quality certification incentives, Travel for LiFERegistration &Certification etc. | Reimbursement offered up 100% or Maximum Rs.2.00 lakh for NationalCertification and Rs.10.00 lakh for international Certification.<br>**a.** Applicants shall be eligible for costs associated with qualitycertification as below :<br>- Cost of certification (registration, application fees and other paymentsto certifying authority) | | | |
| **Sustainability Initiatives Incentive (refer note no.11 below)** | **Terms** | | **Incentive** | |
| | Maximum percentage of investment in capital cost of implementing the sustainability initiatives | | Upto25% | |
| | Ceiling on reimbursement per project | | Up to INR 25 Lakhs or actual GST paid cost what ever is less | |
| Stamp duty and Registration charges exemption | 50% | 75% | 100% | 100% |
| | Sale / Lease deeds executed in respect of purchase / lease of land/ built-uparea for a tourism project, provided thatthe sale deed, lease deed is entered into during the period of the Policy.<br>Mortgage and hypothecation for under taking a tourism project during the Period of thePolicy. | | | |

### १४.४.४ इतर पर्यटन युनिट्ससाठी आर्थिक प्रोत्साहन

आर्थिक प्रोत्साहनासाठी पात्र असलेल्या इतर पर्यटन युनिट्स खालीलप्रमाणे आहेत-

१) साहसी पर्यटन युनिट्स (जल,वायू वजमीन आधारित युनिट)

२) कृषी पर्यटन/ग्रामीण पर्यटन/इको टुरिझम

३) बीच शॅक्स

४) कॅरॅव्हॅन आणि कॅरॅव्हॅनपार्क

५) होम स्टे / बेड आणि ब्रेकफास्ट / निवासी भाड्याने घरे / तंबू निवास / पर्यटक अपार्टमेंट

६) या प्रकरणातील पात्र एकके दर्शविणाऱ्या पॅरामध्ये नमूद केल्याप्रमाणे इतर युनिट्स.

| | **A** | **B** | **C** | **STZ/STD** |
|---|---|---|---|---|
| **Eligibility Period (inyears)** | **03** | **03** | **05** | **05** |
| SGST reimbursement | 50% of SGST on net paid | 75% of SGST of on net paid | 100% of SGST of on net paid | 100% of SGST of on net paid |
| Electricity duty Exemption | 50% | 75% | 100% | 100% |
| Electricity Tariff (Difference between commercial tariff and industrial tariff) | 50% | 75% | 100% | 100% |
| Interest subventions | Up to **5%** Interest subventions onLoan of up to **INR 2 Crores.** Ceilingon total interest subventions shallbe **INR 05 Lakhs** | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 2 Crore.** Ceiling on total interest subventions shall be **INR 05 Lakhs** | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 2 Crore.** Ceiling on total interest subventions shall be **INR 10 Lakhs** | Up to **5%** Interest subventions on Loan of up to **INR 2 Crore.** Ceiling on total interest subventions shall be **INR 10Lakhs** |
| Stamp duty & Registration charges exemption | 50% | 75% | 100% | 100% |
| | Sale / Lease deeds executed in respect of purchase / lease of land/ built- up area for a tourism project, provided that the sale deed, lease deed is entered into during the period of the Policy.<br>Mortgage and hypothecation for undertaking a tourism project during the Period of the Policy. | | | |

1. Above incentives shall not exceed to eligible Fixed capital investment of the project,within the given eligible period whichever is earlier.
2. Eligible units should register with Directorate of Tourism and Ministry of Tourism. Also, use of Booking platform of DoT is mandatory, if available.
3. For availing of incentives, registered units have to apply for eligibility certificate toDirectorate of Tourism.

**टीप:**

**१.** भांडवली प्रोत्साहन प्रत्येक वर्षाच्या अखेरीस व्यावसायिक कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून (C.O.D.- Commercial Operation Date) ५ (पाच) समान वार्षिक हप्त्यांमध्ये दिले जाईल. C.O.D च्या तारखेपासून मागील चार वर्षांत केलेली गुंतवणूक केवळ पात्र असेल.

**२.** या धोरणांतर्गत परिभाषित केलेले कोणतेही पात्र पर्यटन एकक, ज्याने धोरण अधिसूचित केल्याच्या तारखेस किंवा त्यानंतर प्रभावी पाऊल म्हणून पहिली गुंतवणूक (खरेदीची तारीख/कामाची ऑर्डर) केली असावी किंवा मुदत कर्जाचे किंवा विकासाची/बांधकामाची परवानगी प्रथम प्राप्त केली असावी, ते या धोरणांतर्गत पात्र मानले जातील.

**३.** धोरणांतर्गत पात्रतेचा दावा करण्यासाठी, कोणतेही नवीन/विस्तारीकरण, पात्र एकक, व्यावसायिक कार्य सुरू करेल आणि स्थळावरील स्थिर मालमत्ता देखील संपादन करेल, त्यांचा वापर करेल, अशा घटकांनाच फक्त अर्थसहाय्यास पात्र असतील.यामध्ये एककाने परवानगी असलेल्या गुंतवणुकीच्या कालावधीतच पर्यटनाशी संबंधित पात्र घटकांना अर्थसहाय्य दिले जाईल. या धोरणात परिभाषित केल्यानुसार सूक्ष्म, लघु आणि मध्यम तसेच मोठ्या, मेगा आणि अल्ट्रा मेगा युनिट्ससाठी उत्पादन उद्योगांसाठी परवानगी असलेला गुंतवणूक कालावधी चार वर्षांचा असेल.

**४.** पर्यटन धोरण २०१६ नुसार पात्र पर्यटन घटकांसाठीच्या प्रोत्साहनाच्या मंजूर पात्रतेच्या कालावधी, त्या प्रकल्पांना मंजूर केल्याप्रमाणे, मान्य असलेल्या पात्र कालावधीपर्यंत आपोआप वाढवला जाईल. ज्या प्रकल्पांनी 'पर्यटन धोरण २०१६' अंतर्गत तात्पुरते नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त केले आहे, परंतु त्यांनी व्यावसायिक कामकाज सुरू केलेले नाही किंवा त्यांना अंतिम पात्रता प्रमाणपत्र मिळालेले नाही, अशा प्रकल्पांनाहीअंतिम पात्रता प्रमाणपत्र हे 'पर्यटन धोरण २०२४' अंतर्गत अनुज्ञेय असतील.

**५.** जास्तीत जास्त प्रोत्साहन वितरण म्हणजे वार्षिक आर्थिक कमाल मर्यादा पात्रतेच्या कालावधीने विभाजित केलेल्या पात्र भांडवली गुंतवणुकीच्या बरोबरीची असावी. पात्र भांडवली गुंतवणूक किंवा पात्रता कालावधी यापैकी जो आधी असेल त्या मर्यादेपर्यंत अनुज्ञेय प्रोत्साहन देय राहील. त्यानंतर कोणतीही मुदतवाढ अनुज्ञेय नाही.

**६.** व्याज अनुदान केवळ मुदत कर्जांवर लागू असेल.

**७.** भांडवली प्रोत्साहनासाठी पर्यटन धोरण २०२४ अंतर्गत तात्पुरत्या नोंदणी प्रमाणपत्रासाठी अर्ज केलेले किंवा अर्ज केलेले पात्र पर्यटन घटक भांडवली प्रोत्साहनासाठी पात्र असतील.

**८.** पर्यटन संचालनालय धोरणात्मक निकष आणि मार्गदर्शक तत्त्वांनुसार सर्व प्रकल्पांना प्रोत्साहन देण्यास मान्यता देईल.

**९.** मेगा आणि अल्ट्रा मेगा प्रकल्पांसाठी अतिरिक्त सवलती किंवा प्रोत्साहनांची मागणी असल्यास प्रकरण निहाय तपासून त्यावर निर्णय घेण्याचे अधिकार मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली गठित उच्च स्तरीय समितीस असतील.

**१०.** Travel for Life मिशन अंतर्गत प्रकल्प धारकाने नोंदणी करणे अनिवार्य असेल.

**११.** पर्यटन संचालनालयाअंतर्गत नोंदणी करणे बंधनकारक असेल तसेच ऑनलाइन प्रणाली विकसित झाल्यानंतर त्या पोर्टलचा वापर बुकिंग प्लॅटफॉर्मचा वापर व ऑनलाइन ॲप्लिकेशन सुविधेचा वापर इ. बाबी अनिवार्य असतील.

**१२. पर्यटन घटकांसाठी शाश्वत उपक्रम प्रोत्साहन:**

अ) जलसंवर्धनाच्या उपाययोजना. (Water Harvesting etc.)

आ) पर्यटन घटकाच्या परिसरातील जलसाठ्यांतील गाळ काढून जलसाठ्यांचे पुर्नसंवर्धन करणे.

इ) प्रकल्पातून सोडण्यात येणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रिया करून परिसरातील निसर्ग परिसंस्थेवर आधारित प्रणाली स्थापित करणे.

ई) सौर पी. व्ही. पटल, सौर पवन संकरीत, लघु पवन टर्बाइन, सौर जल पंप, सौर दिवे, सौर हीटर्स, स्वयंपाकाची प्रणाली इत्यादींचा समावेश असलेल्या अक्षय ऊर्जा निर्मिती केंद्रांची स्थापना करणे.

उ) प्रकल्पात वस्तू आणि मानवी वाहतुकीसाठी प्रवासी आणि उपयुक्तता याकरीता विद्युत वाहनांचा वापर करण्यास प्राधान्य द्यावे व पर्यटकांना पर्यटन क्षेत्रात ई.व्ही व्हेइकलच्या चार्जिंगसाठी सुविधा पुरविणे.

ऊ) प्रक्रिया केलेल्या पाण्याचा पुरवठा आणि वापर वाढवण्यासाठी सक्रिय गाळ प्रक्रिया (ए. एस. पी.), मेम्ब्रेन बायो-रिएक्टर्स (एम. बी. आर.), रिव्हर्स ऑस्मोसिस (आर. ओ.), इको सिस्टम आधारित उपचार इत्यादी तंत्रज्ञानाचा वापर करून सांडपाणी प्रक्रिया आणि पुर्नवापर प्रणाली स्थापित करणे.

ऋ) मनुष्यबळावरील अवलंबित्व कमी करण्यासाठी, स्मार्ट मीटर/पंप/सेन्सर्स, डेटा एनालिटिक्स आणि क्लाऊड सोल्यूशन्सचा वापर करून व्यवसायाची निरंतरता आणि दूरस्थ कार्ये वाढविण्यासाठी पाणी आणि सांडपाण्यासाठी स्मार्ट सोल्यूशन्स/आयओटीची स्थापना.

ऌ) ऑनसाइट सेंद्रिय कचरा प्रक्रिया यंत्रणा बसविणे.

ऍ) प्रदूषण नियंत्रणासाठी आवश्यक त्या उपाययोजना करणे (पी. सी. डी.)

**१४.४.५ व्यवहार्यता अंतर निधी (Vibalitiy Gap Funding)**

**१.** पर्यटन विकासाचा व्यापक दृष्टीकोन व त्याच्यातून होणारे फायदे लक्षात घेऊन जे प्रकल्प आर्थिकदृष्ट्या व्यवहार्य नाहीत अशा एकल प्रकल्पांना आंतरव्यवहार्यता निधीची आवश्यकता असेल. आंतरव्यवहार्यता निधी भांडवली स्वरूपात असेल किंवा प्रकल्प बांधकामाच्या कालावधीत परिचालन निधी म्हणून असेल किंवा प्रकल्प चालू झाल्यापासून ४ वर्षापर्यंत पात्र असेल असे कोणतेही प्रकल्प तथापि आंतरव्यवहार्यता निधी हा प्रकल्प किंमतीच्या ४०% पेक्षा जास्त नसावा व एकूण भांडवली निधी ग्राह्य धरताना किमान निविदेत नमूद केलेल्या किंमतीच्या समान असावा.

**२.** नीती आयोगाने तयार केलेल्या पी. पी. पी. प्रकल्पांसाठीच्या आदर्श संहितेचा व केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाने वेळोवेळी जारी केलेल्या मार्गदर्शक तत्त्वे विचारात घेण्यात यावे. निविदा तयार करण्यासाठी आणि निविदा प्रक्रिया कार्यान्वयनासाठी व्यवहार सल्लागारांची नेमणूक केली जाईल.

**१४.४.६. महिला उद्योजक / अनुसूचित जाती/जमाती/ भिन्न सक्षम घटक यांना अतिरिक्त प्रोत्साहन**

महिला उद्योजक / अनुसूचित जाती/जमाती/ भिन्न सक्षम घटक मालकीचे आणि व्यवस्थापित असलेले नवीन पर्यटन विभाग (संस्थेमध्ये किमान ५१ टक्के समभाग सहभागासह) आणि दिव्यांगांना अतिरिक्त ५ टक्के भांडवली प्रोत्साहन आणि अतिरिक्त २ वर्ष कालावधीसाठी प्रोत्साहने अनुज्ञेय असेल. या पेक्षा जास्त कालावधी करीता निर्णय घेण्याचा अधिकार उच्चाधिकार समितीस असेल.

### १४.४.७. राज्यात येणाऱ्या पर्यटकांसाठी टूर ऑपरेटर, एजंट्स, डेस्टिनेशन मॅनेजमेंट कंपनीस (डी. एम. सी.) प्रोत्साहन

| Types | Minimum Pax (Annual Per Operator) | Minimum Annual Turn over (Per Operator) | Tax Rebate on annual turnover for tour packages in Maharashtra State | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | Tour Packages with 100% foreign national tourist | Tour packages on destinations other than Metro | In Metro and Municipal Corporation area |
| Travel Operators/Agents | 500 | INR 20,00,000 | 15% | 12% | 12% |
| MICE | 1500 | INR 10,00,00,000 | | | |
| Destination Weddings | 1000 | INR 75,00,000 | | | |
| Medical Tourism Operators (For International Patients Only) | 500 | INR 20,00,000 | 15% | Not Applicable | Not Applicable |

**टीप:**

क) टूर ऑपरेटर्स/एजंट्स/डीएमसी यांनी पर्यटन संचालनालय पोर्टलवर किंवा ऑनलाइन प्रणालीवर त्यांचा हेतू आणि/तात्पुरते टूर सर्किट, पर्यटकांची संख्या (एम/एफ) इ. जाहीर करून ऑनलाइन नोंदणी करावे.

ख) पर्यटन संचालनालयाने विकसित केलेल्या प्रणालीद्वारे आरक्षण / नियोजन केल्यास प्रोत्साहने घेण्यासाठी त्यांना प्राधान्य देण्यात येईल.

ग) पर्यटकांची माहिती पर्यटन संचालनालयाला देणे अनिवार्य असेल.

घ) महाराष्ट्र राज्याची जी. एस. टी. बिले जिथे आवश्यक असेल तिथे केवळ महाराष्ट्र राज्याची उलाढाल मोजण्यासाठी स्वीकारली जातील.

ङ) अंतिम बिल/अर्ज सनदी लेखापाल / सनदी लेखापालांची संस्थेने प्रमाणित केलेला असावा.

च) आर्थिक वर्षाच्या तिमाही आधारावर प्रोत्साहनांची परतफेड केली जाईल.

छ) संबंधितांशी सल्लामसलत करून पर्यटन विभागाच्या पर्यटन स्थळांची यादी प्रकाशित करेल.

ज) पर्यटन संचालनालयाद्वारे धोरणातील निकषानुसार आणि मार्गदर्शक तत्त्वांनुसार सर्व पात्र प्रकल्पांना अनुज्ञेय प्रोत्साहने देण्यात येतील.

झ) राज्याला भेट देणाऱ्या टूर ऑपरेटर आणि पर्यटकांसाठी विम्याची तरतूद करण्यास परवानगी आहे. शासकीय ऑनलाईन पोर्टल किंवा स्वीकारलेल्या पद्धतीद्वारे बुक केलेल्या टूर पॅकेजसाठी विम्याचा पर्याय उपलब्ध असेल. यासाठी स्वतंत्र मार्गदर्शक तत्वे पर्यटन संचालनालयाद्वारे निर्गमित करण्यात येतील.

### १४.४.८. देश आणि परदेशातील पर्यटन प्रदर्शने, ट्रॅव्हल शो/मार्ट्समध्ये सहभागी होण्यासाठी पर्यटन भागधारकांना प्रोत्साहन

| Sr.No. | Participation in | Quantum of financial assistance |
|---|---|---|
| 1. | Tourism Event with in Maharashtra | 50% of cost of rental of stall/ space at the event or INR 2 Lakh, which ever is lower |
| 2. | Tourism Event outside Maharashtra | 50% of cost of rental of stall/ space at the event or INR 3 Lakh, which ever is lower |
| 3. | International Tourism Event out side India | 50% of cost of rental of stall/ space at the event or INR 5 Lakh, which ever is lower |

राज्यातील पर्यटन स्थळाची प्रसिद्धी देण्यासाठी आयोजित करण्याच्या events मध्ये पर्यटनाशी संबंधित उत्पादने यांना प्राधान्याने व्यासपीठ उपलब्ध करून दिले जाईल. याकरीता प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य या तत्त्वावर, एका वर्षात जास्तीत जास्त ५ राष्ट्रीय (राज्यात व राज्याबाहेर) आणि ५ आंतरराष्ट्रीय सहभागांसाठी हे प्रोत्साहन दिले जाईल.

### १४.४.९. ग्रामीण पर्यटन मेळा / वार्षिक मेळा आयोजित करण्यासाठी प्रोत्साहन

मूर्त आणि अमूर्त वारशासह पर्यटन स्थळे लोकप्रिय करण्यासाठी पर्यटन विभागमोठे किंवा लहान पर्यटन उत्सवांचे वार्षिक नियोजन करून पुढील ५ वर्षाचे दिनदर्शिका तयार करून ते प्रकाशित करेल.

| Sr. No. | Category of Fair | Quantum of financial assistance |
|---|---|---|
| 1. | Major Fair | INR 10 lakhs per year per organizer |
| 2. | Minor Fair | INR 5 lakhs per year per organizer |
| 3. | List of major fairs would be issued by Directorate of Tourism, Maharashtra. Incentive would be provided to max. 3 events per year per organizer. | |

### १४.४.१०. युवा पर्यटनासाठी प्रोत्साहन

शासकीय मध्यवर्ती शाळा (GIC/GGIC) / सरकारी पदवी महाविद्यालय / नवोदय विद्यालय / केंद्रीय विद्यालय / श्रमिक शाळा (अटल) / कस्तुरबा गांधी विद्यालय, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (ITIs),सर्व अनुदानित व विनाअनुदानित शैक्षणिक संस्था इत्यादी शैक्षणिक संस्थांमध्ये स्थापन केलेल्या प्रति युवा क्लबला एका वर्षासाठी रू. २५,००० एवढे अनुदान दिले जाईल. दिनांक १८ जुलै २०२३ च्या शासन निर्णयानुसार पर्यटनाशी संबंधित उपक्रमांसाठी (उदा. राज्यभर सहलीचे आयोजन करणे आणि मुलांसह शाळा/जिल्हा स्तरावर पर्यटन उपक्रम राबवणे) YUVA अंतर्गत केंद्रीय पर्यटन मंत्रालयाच्या धर्तीवर एक अंमलबजावणी एजन्सीची नियुक्ती करून निर्धारित केलेल्या देखरेख आणि अंमलबजावणी एजन्सीद्वारे आर्थिक सहाय्य केले जाईल.

### १४.४.११. पर्यटनपुरस्कार

| Types of Tourism awards | District Level | Division Level | State Level | Awardee |
|---|---|---|---|---|
| Best Tourism Village | ---- | INR 5 Cr | INR10 Cr | Collector, Divisional Commissioner, Local Self Government |
| Best Homestay | INR.25,000/- | INR.50,000/- | INR1 Lakh | Homestay |
| Best Agro Tourism units | INR.25,000/- | INR.50,000/- | INR1 Lakh | Agro Tourism Unit |
| **Note:** Amount received as award for best tourism village shall utilized for development of concerned best tourism village by Directorate of Tourism with Local Self-Government jointly | | | | |

### १४.४.१२. हॉस्पिटॅलिटी संबंधित प्रशिक्षण आणि होमस्टे/व्हिलाज्/बंगलोज् संलग्नतेसाठी प्रोत्साहन

| Sr.No. | Item | Incentive |
|---|---|---|
| 1. | Hospitability unit which will send its employees, tour guides etc. for Hospitability training through reputed accredited Institute/College etc. | **Reimbursement of 75%** of the cost of fees paid for Short/Medium term course/training or INR 12,000, whichever is less |
| 2. | Hospitability units which will establish affiliation with Home stays or its Cluster, Tourist villas, Agro Tourism units for its quality improvement, skilling of owner of such affiliated units, Hand holding, training etc. | The two parties will sign MoU and will receive **SGST reimbursement** forthe turnover achieved through the MoU. |

### १४.४.१३. कौशल्य विकास कार्यक्रमांना प्रोत्साहन

१. पर्यटन संचालनालयांतर्गत नोंदणी केलेल्या हॉटेल व्यावसायिक, टूर ऑपरेटर इत्यादींनी नियुक्त केलेल्या मनुष्यबळासाठी पर्यटन विषयक अभ्यासक्रम आणि मोड्यूल्स (विदेशी भाषा कौशल्यांसह) अशा मनूष्यबळासाठी प्रदान केले जातील. जास्तीत जास्त ६०० मनुष्यबळ प्रतिवर्षी या प्रोत्साहनाचा लाभ घेऊ शकतील. या योजनेचा एक व्यक्ती एकाच वेळेस लाभ घेऊ शकेल. अभ्यास क्रमाच्या शुल्काची १००% किंवा कमाल रू.१२,५०० यापैकी जे कमी असेल ते पंधरा दिवस किंवा त्याहून अधिक कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी प्रति विद्यार्थी विद्यावेतन अदा केले जाईल.

२. पर्यटन संचालनालयांतर्गत नोंदणी केलेल्या स्थानिक पर्यटन क्षेत्रांजवळील पर्यटक मार्गदर्शकांना रू.७,५००/- एवढे मासिक मानधन दिले जाईल. हे तीन महिन्यांच्या कालावधीसाठी दिले जाईल. यासाठी पर्यटक मार्गदशकाला एक विदेशी भाषा प्रमाणपत्र, गाईड प्रशिक्षण प्रमाणपत्र, पर्यटन संचालनालया बरोबर

नोंदणी, पर्यटन संचालनालयाच्या पोर्टलवर त्याने नियोजित केलेल्या सहलींची माहिती पुरविणे, त्याने निवडलेल्या विषयाबाबत त्याच्या क्षेत्रात किमान १० सहली प्रतिमहा यशस्वी रीत्या पूर्ण केलेल्या असाव्यात, राज्यातील विभागनिहाय जास्तीत जास्त प्रति विभाग १०० सहल मार्गदर्शक यांना हा लाभ देण्यात येईल. या योजनेअंतर्गत टूर गाईडला धोरणाच्या कालावधीत एकदाच प्रोत्साहन देय असेल.पर्यटन संचालनालयाबरोबर नोंदणीकृत टूर ऑपरेटर असोसिएशन / हॉटेल / रिसॉर्टस् / टूर गाईड असोसिएशन इ. यांची शिफारस यासाठी बंधनकारक राहील.

**३.** औद्योगिक संस्था/वाणिज्य मंडळे/मान्यता प्राप्त पर्यटन आणि आदरातिथ्य संस्था इत्यादींनी त्यांच्या सीएसआर निधीचा वापर राज्याच्या पर्यटन मनुष्यबळाच्या विकासासाठी प्रोत्साहन निधी म्हणून वापर करावा.

**१४.४.१४. पर्यटन / आतिथ्य उद्योगातील संशोधनासाठी प्रोत्साहन**

**१.** मान्यता प्राप्त व पर्यटन संचालनालयाकडे नोंदणीकृत केलेल्या प्रवासी संघटना/हॉटेल संघटना/चेंबर ऑफ कॉमर्स/इतर प्रवास आणि आतिथ्य संस्था/नामांकित आणि नोंदणीकृत स्वयंसेवी संस्था (जसे की निसर्गासाठी जागतिक निधी, कासव संवर्धन, वारसा रूपांतरण, वन्यजीव, हस्तकला इ.), व्यवस्थापन संस्था आणि विद्यापीठांनी महाराष्ट्रातील प्रवास आणि पर्यटन/आतिथ्य क्षेत्रावरील संशोधन अभ्यास करण्यासाठी जास्तीत जास्त १० लाखाच्या मर्यादेत प्रोत्साहान देईल. यासाठी संचालनालय प्रस्ताव मागवून त्यांची तपासणी करून ते प्रस्ताव शासनास सादर करेल. विभागाचे सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समिती दरवर्षी कमाल ५ पर्यंतच्या प्रस्तावांना आर्थिक सहाय्य केले जाईल.

**२.** उद्योगाची प्रासंगिकता आणि आवश्यकतेनुसार दरवर्षी संशोधनाचा विषय निश्चित केला जाईल. दरवर्षी अशा ५ (पाच) एवढ्या मर्यादेत संशोधन प्रस्तावांना मंजुरी देण्यात येईल. मान्यता प्राप्त आदरातिथ्य संघटना आणि पर्यटन आदरातिथ्य आणि व्यवस्थापन शैक्षणिक संस्थांमार्फत होणाऱ्या संशोधनाला प्राधान्य दिले जाईल.

**१४.४.१५. आयसीटी (माहिती आणि संप्रेषण तंत्रज्ञान) सक्षमी करणासाठी प्रोत्साहन**

**१.** डिजिटल मंच आणि नवीन माहिती तंत्रज्ञानाचा वापर करणाऱ्या राज्यातील राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पर्यटन आणि प्रवासी बाजारपेठा, चर्चासत्रे, प्रदर्शन आणि इतर कार्यक्रमांच्या आयोजनासाठी आणि त्यांना सहाय्य करण्यासाठी प्रतिवर्षी रू.१० लाख रुपयांपर्यंत प्रोत्साहन दिले जातील. एका आर्थिक वर्षात फक्त एकाच कार्यक्रमास असे प्रोत्साहन अनुज्ञेय राहील.

**२.** पर्यटन संचालनालयाबरोबर नोंदणीकृत केलेल्या टूर आणि ट्रॅव्हल ऑपरेटर्स यांना वार्षिक निर्मिती खर्चाच्या २५ टक्के वा अधिकतम रू.१० लाखाच्या मर्यादेत आर्थिक प्रोत्साहन मिळण्यास पात्र असतील. ऑडिओ/व्हिडिओ मार्गदर्शक, डिजिटल प्रचार साहित्य (डिजिटल प्लॅटफॉर्म/मोबाइल अनुप्रयोग/वेबसाइट/मेटाव्हर्स), कृत्रिम बुद्धिमत्ता, रोबोटिक्स, आभासी वास्तव निर्मितीसाठी प्रतिवर्षी रू.१० लाख रुपयांपर्यंत प्रोत्साहन दिले जाईल.एका आर्थिक वर्षात फक्त १० घटकांना खर्चाच्या २५ टक्के अथवा रू.१०.०० लाख असे प्रोत्साहन अनुज्ञेय राहील. हे अनुदान फक्त राज्यातील पर्यटन स्थळांच्या प्रसिद्धी व प्रचार इत्यादीसाठी लागू राहील.

**१४.४.१६. दुर्मिळकला, संस्कृती आणि पाककला पुनरुज्जीवित करण्यात मदत करण्यासाठी प्रोत्साहन**

**१.** राज्याअंतर्गत असलेल्या प्रसिद्ध पर्यटन स्थळांच्या ५० किलोमीटर परीघातील राज्याच्या दुर्मिळ किंवा लुप्तप्राय स्वदेशी कला, संगीत, हस्तकला, लोकनृत्य आणि पाककृतींचे संवर्धन, इत्यादींना प्रोत्साहन आणि पुनरुज्जीवन करण्यात गुंतलेल्या प्रत्येक संवर्गातील व्यक्ती अथवा समूहाला प्रोत्साहने देण्याचे धोरण असून संबंधित धारकाकडून आवेदन पत्र मागवून रू.५.०० लाख रुपयांच्या मर्यादेत सचिव (पर्यटन) यांच्या अध्यक्षतेखाली समितीद्वारे निवड केलेल्या गटास / व्यक्तीस एकवेळचे प्रोत्साहन देण्यात येईल. याकरीता संबंधित व्यक्ती / समूह / गट यांनी पर्यटन संचालनालयाकडे नोंदणी करणे अनिवार्य असेल. याकरीता दुर्मिळ कला, संस्कृती, हस्तकला आणि खाद्यपदार्थांची अधिसूचित यादी पर्यटन संचालनालयाकडून निर्गमित करण्यात येईल त्यामध्ये बदल करण्याचे अंतिम अधिकार हे पर्यटन संचालनालयाकडे असतील.

**२.** वरील प्रयोजनासाठी प्रथम नोंदणी / प्रथम आवेदन पत्र या तत्त्वावर प्रत्येक क्षेत्रात वर्षाला केवळ १० व्यक्ती/गट/समूह यांना प्रोत्साहन दिले जाईल.

**१४.४.१७. नाविन्यपूर्ण उत्पादने / सेवांसाठी प्रोत्साहन**

राज्यातील नवीन आणि नाविन्यपूर्ण स्वरूपात यशस्वीपणे कार्यान्वित झालेले आहेत अशा नाविन्यपूर्ण १० पर्यटन प्रकल्पांसाठी पर्यटन संचालनालयाद्वारे निवड करून रू.५०,०००.०० एवढे प्रोत्साहन प्रदान केले जातील.

**१४.४.१८. दिव्यांगांना रोजगार देण्यासाठी प्रोत्साहन**

ज्या पर्यटन प्रकल्पात अधिकाअधिक ५ कामगार हे दिव्यांग प्रवर्गातील असतील अशा प्रकल्पास दरमहा प्रति कामगार रु.१५००.०० एवढे दिव्यांग कामगार वेतन प्रोत्साहन देण्यात येईल.

**१४.४.१९. पर्यावरण पर्यटन प्रमाणपत्रासाठी प्रोत्साहन**

राज्यातील जे प्रकल्प केंद्रीय पर्यटन मंत्रालयाच्या शाश्वत पर्यटन (Sustainable Tourism) च्या निकषाप्रमाणे असेल अशा पहिल्या १० प्रकल्पांना रू. १०.०० लक्ष एवढ्या मर्यादेपर्यंतच्या खर्चाची परतफेडीसाठी प्रोत्साहन अनुज्ञेय राहील. तथापि एका प्रकल्पाला एकदाच लाभ अनुज्ञेय असेल. ज्या प्रकल्पांना GRIHA / IGBC / LEED अशा संस्थेंद्वारे प्रमाणित करण्यात आलेले आहेत, अशा प्रकल्प धारकांना यासाठी प्राधान्य देण्यात येईल.

**१४.५. पात्र भांडवली गुंतवणूक (Eligible Capital Investment)**

**१४.५.१.** "पात्र भांडवली मालमत्ता" किंवा "ECI" चा म्हणजे पायाभूत सुविधा (कुंपण, अंतर्गत रस्ते, चिन्हे, शौचालये आणि इतर मूलभूत पायाभूत सुविधा) यामध्ये खालील घटकांचा समावेश आहे,

१) संरचना आणि इमारती; झाडे,
२) स्वदेशी आणि आयात केलेली यंत्रसामग्री आणि उपकरणे,
३) साहित्य हाताळणी उपकरणे
४) यांत्रिक, इलेक्ट्रिकल आणि प्लंबिंग इंस्टॉलेशन्स
५) फिक्स्चर, फर्निचर आणि फिटिंग्ज

६) घन व द्रव शास्त्रीय कचरा प्रक्रिया सुविधा
७) ट्रान्सफॉर्मर जनरेटर
८) कॅप्टिव्ह पॉवर प्लांट,अक्षय ऊर्जा स्त्रोत इ.
९) उपरोलेखित आणि आवारात वापरण्यासाठी स्थापित केलेल्या इतर सहाय्यक सुविधांसह उपयुक्तता आणि स्थापना शुल्क इत्यादींचा समावेश आहे.

**१४.५.२. पात्र भांडवली गुंतवणूक (ECI) साठी अपात्र घटक:**

१) पात्र भांडवली गुंतवणूक (ECI) यामध्ये केवळ SGST परतावा वगळता भांडवली प्रोत्साहनांसाठी जमिनीची किंमत ही भांडवली गुंतवणुकीसाठी पात्र असणार नाही.

२) पात्र भांडवली गुंतवणूक (ECI) वरील प्रोत्साहन हे प्रकल्प कार्यान्वित (Commercial Operational Date) होण्याच्या दिनांकापासून मागील ४ वर्षांत केलेली भांडवली गुंतवणुकच फक्त पात्र असेल. त्याआधीच्या कालावधीत केलेली गुंतवणूक ही प्रोत्साहनास पात्र असणार नाही.

३) अमूर्त मालमत्ता, ज्यात मर्यादा न ठेवता, बौद्धिक संपदा अधिकार आणि सद्भावना यांचा समावेश आहे अशा बाबींवरील गुंतवणुक अपात्र असेल.

४) राज्य / केंद्र सरकार / किंवा इतर कोणत्याही एजन्सीकडून अनुदान किंवा तत्सम प्रकारचे आर्थिक सहाय्यघेतले असल्यास ते अनुदान प्रोत्साहनासाठी पात्र नसेल.

**१४.५.३.** राज्य/केंद्र शासन/किंवा इतर कोणत्याही संस्थेकडून अनुदान किंवा तत्सम प्रकारचे भांडवली मालमत्तांसाठी अर्थसहाय्य दिलेले असावेत आणि त्या प्रकल्पाच्या मालकीच्या असाव्यात किंवा भाडेपट्टीवर असाव्यात, परंतु अशा **भाडेपट्टीचा कालावधी** पुढीलप्रमाणे असेलः

१) इमारतीसाठी, १५ वर्षांपेक्षा कमी नाही; आणि
२) इतर सर्व स्थिर मालमत्तेसाठी – मालमत्तेच्या अंदाजे निर्देशित आयुष्याच्या निम्म्यापेक्षा कमी नसाव्यात (जेथे अशा अवशिष्ट जीवनकालाचा शासनाच्या परवानाधारक अभियंत्याद्वारे केलेल्या निकषानुसार करण्यात येईल).
३) भाडेपट्ट्याने दिलेल्या भांडवली मालमत्तेचे मूल्य या मालमत्तेच्या निव्वळ वर्तमान मूल्यानुसार, लीज डीडच्या अंमलबजावणीच्या तारखेनुसार किंवा सामंजस्य कराराच्या तारखेनुसार (लागू असल्यास), यापैकी जे नंतर असेल, १०% सवलतीचा दर वापरून, किंवा म्हणून केले जाईल. गुंतवणुकीच्या कालावधीत लीज अंमलात आणली गेली असेल तर वेळोवेळी सूचित केले जाऊ शकते.
४) सर्व भांडवली मालमत्तेचा वापर आणि केवळ प्रकल्प साइटवर स्थापित केला जावा.
५) ECI मधील पात्र गुंतवणुकीत हे समाविष्ट नसावे:
६) बांधकामा पूर्वीचा खर्च आणि सल्लागाराचा खर्च
७) भांडवली व्याज.
८) खेळते भांडवल

९) विस्तार प्रकल्पांच्या बाबतीत, वर वर्णन केलेल्या गणनेनुसार, ECI ची गणना केवळ विस्तार घटकासाठी केली जाईल. विस्तार विद्यमान क्षमतेच्या ५०% पेक्षा जास्त असावा (उदा. रूम्स/ राईडस्इ.).

## १४.६. बिगर-आर्थिक प्रोत्साहन

### १४.६.१. कृषी पर्यटनाला प्रोत्साहन

क) कृषी पर्यटन व्यवसायास यापुढे शेतीपुरक व्यवसाय म्हणून ओळखण्यात येईल जसे, शेळीपालन, दुग्धव्यवसाय, रेशीमपालन, मधुमक्षीपालन इ.

ख) संबंधित सक्षम अधिकाऱ्यांकडून पडताळणी झाल्यानंतर शेतकऱ्यांना १० वर्षांसाठी कृषी-पर्यटन परवाना देण्यात येईल.

ग) पर्यटन संचालनालय अशा धोरणाच्या अंमलबजावणीसाठी कौशल्याच्या विकासाला प्रोत्साहन देईल आणि कृषी पर्यटन उद्योगांसाठी प्रशिक्षणास प्रोत्साहन देईल.

घ) शेतकरी कृषी उत्पादने किंवा स्थानिक उत्पादने, हस्तकला इ. पर्यटक वअभ्यागतांना उपलब्ध करून देण्यास या व्यासपिठाचा वापर करता येईल.

ङ) कृषी पर्यटन उद्योगांमध्ये होमस्टेसाठी घरगुती दराने वीज आकारली जाईल.

च) तात्पुरते तंबू वपॉड्स, मोबाइल हाऊस, ट्री हाऊस, आदिवासी झोपड्या, इको हाऊस, मचान, वैदिक पद्धतीचे घर इत्यादी निवासस्थानांना परवानगी आहे.

छ) कृषी पर्यटनासाठी शेतकऱ्याला यापुढे बिगर-कृषी परवान्याची आवश्यकता नसेल. मात्र, संबंधित कृषी पर्यटन एककांच्या उपक्रमांची माहिती त्या भागातील महसूल विभाग यांना माहितीसाठीदेण्यात यावे.

### १४.६.२. वेलनेस पर्यटनासाठी प्रोत्साहन

प्रकल्प धारकाने शेतकऱ्याबरोबर किमान १० वर्षांच्या दीर्घ भाडेपट्टीचा करार केल्यास असा घटक प्रोत्साहानासाठी पात्र असेल.

### १४.६.३. कॅरॅव्हॅन पर्यटनासाठी प्रोत्साहन

क) राज्यात पर्यटनाच्या उद्देशाने कॅरॅव्हॅन/कॅम्पर ट्रक/व्हॅन चालवण्यासाठी मंजुरी देण्यात येत आहे. राज्य परिवहन आयुक्त याबाबतची वाहनांची नोंदणी करण्याची अंमलबजावणी करतील.

ख) कॅरॅव्हॅनसाठी सार्वजनिक पार्किंगच्या ठिकाणी प्राधान्याने स्थानिक प्राधिकरणांनी पार्किंगसाठी अशा वाहनांना परवानगी अनुज्ञेय असेल.

ग) अशा वाहनांना ज्या राज्यात पर्यटन वाहन म्हणून वापर करावयाचा असेल तेथील संबंधित प्राधिकाऱ्याकडून वाहनांना पर्यटन वाहन म्हणून दर्जा देण्यात यावा.

घ) महाराष्ट्र टूरिझम सोशल प्लॅटफॉर्म व फॅम टूर्सद्वारे टुरिझमचा प्रचार व प्रसार करेल.

ङ) सर्व कॅरॅव्हॅन धारकांना पर्यटन संचालनालयाकडे नोंदणी करणे आवश्यक असेल.

**१४.६.४. बिगर-कृषी कर आणि विकास शुल्क सूट**

१) सर्व पर्यटन प्रकल्पांना बिगर-कृषी कर आणि बिगर-कृषी परवानगीतून संपूर्ण सूट अनुज्ञेय असेल.

२) MTDC / पर्यटन संचालनालय किंवा खाजगी गुंतवणूकदार/प्रस्तावकाद्वारे चालवल्या जाणाऱ्या सर्व प्रकल्पांना हे लागू होईल.

३) कृषी पर्यटन उद्योग, कॅरॅव्हॅनपार्क, हेली पर्यटन प्रकल्प, ई. व्ही. चार्जिंग स्टेशन्स, साहसी खेळांसाठी बिगर कृषी परवानगीची आवश्यकता राहणार नाही.

४) पर्यटन/आदरातिथ्य घटक मंजूर करताना विकास शुल्कातून सूट दिली जाईल.

**१४.६.५. परवाने आणि मंजुरीचे नूतनीकरण**

पर्यटन प्रकल्पांसाठी निवास परवाना, खाण्याचा परवाना, पोलिस परवानगी, दुकान आणि आस्थापना कायद्यांतर्गत परवाना आणि अन्न आणि औषध प्रशासनाखालील परवाना यासारखे विविध परवाने आणि मंजुरी आवश्यक असतात. या परवान्यांचे दरवर्षी नूतनीकरण करावे लागते. या धोरणानुसार, या परवाने/परवानग्यांसाठी सध्याच्या वार्षिक नूतनीकरणाऐवजी संबंधित प्राधिकराणाद्वारे ते दर ५ वर्षांनी करावे.

**१४.६.६. प्रोत्साहन पॅकेज योजना**

उद्योग, ऊर्जा आणि कामगार विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ०७, ०८ व ०९ येथे नमुद केलेल्या शासन निर्णयानुसार प्रोत्साहनपर योजनेशी जोडून किंवा त्यानंतरच्या कोणत्याही बदलाशी जोडून राज्यातील पर्यटन उद्योगांना प्रोत्साहन देणे. या धोरणांतर्गत प्रोत्साहनपर योजना राज्यातील पर्यटन क्षेत्राच्या गरजेनुसार तयार केल्या आहेत.

**१४.६.७. पर्यटन घटकांना उद्योग म्हणून घोषित केल्यावर होणारे फायदे**

या धोरणांतर्गत समाविष्ट असलेल्या सर्व पर्यटन प्रकल्पांना उद्योग म्हणून परिभाषित प्रकल्पांना मिळणाऱ्या इतर फायद्यांच्या उद्देशाने 'उद्योग' मानले जाईल.

**१४.६.८. पायाभूत सुविधा समर्थन**

रस्ते, पाणीपुरवठा जोडणी, सबस्टेशन, ट्रान्सफॉर्मर, सेवा केबल, पारेषण मार्ग इ. सारख्या पायाभूत सुविधा पुरविण्याबाबत राज्यप्राधान्य देईल. पर्यटन घटकाचे बांधकाम जलदगतीने होणे, सुरक्षित/सुरळीत वाहतुक,विजेच्या खांबाची देखभाल व दळणवळण, विद्युत तारेची जोडणी, इत्यादींचे जलद/वेगाने स्थलांतर सुलभ होण्यासाठी पायाभूत सुविधांचा विस्तार केला जाईल.

**१४.६.९. Open acces वीजपुरवठा**

या धोरणांतर्गत येणाऱ्या सर्व पर्यटन उद्योगांना open access द्वारे वीज जोडणी करण्यात येईल.

**१४.६.१०. पर्यावरण आणि अग्निसुरक्षा**

जेथे लागू असेल तेथे, पर्यावरण संरक्षण कायदा, १९८६ आणि त्याअंतर्गत जारी केलेल्या अधिसूचनांनुसार धोरणांतर्गत येणाऱ्या सर्व पर्यटन केंद्रांसाठी राज्य १ महिन्याच्या कालावधीत पर्यावरण आणि अग्निसुरक्षा अनुमती प्रदान करण्यात यावी.

## १४.६.११. अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक आणि पर्यटन / आदरातिथ्य उद्योग जागा वापर

### क) चटई क्षेत्र निर्देशांक

i. उद्योग, ऊर्जा आणि कामगार विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ११ येथील शासन निर्णयान्वये चटई क्षेत्र निर्देशकांशी संबंधित घटकांसाठी बृहन्मुंबई क्षेत्र व राज्यातील उर्वरित क्षेत्रासाठी अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार अनुज्ञेय असतील :-

| Sr. No. | Minimum Road Width | Maximum Permissible FSI Greater Mumbai Region | Maximum Permissible FSIR Rest of Maharashtra |
|---|---|---|---|
| 1 | 12m | Upto3 | Upto3 |
| 2 | 18m | Upto4 | Upto3.5 |
| 3 | 27m | Upto5 | Upto4 |

ii. अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकांची कमाल मर्यादा ही वर नमूद केल्यानुसार अथवा स्थानिक विकास नियंत्रण नियमावलीतील तरतुदीनुसार यापैकी जो अधिक असेल त्यानुसार अनुज्ञेय राहील, यामध्ये नगर विकास विभागाने घोषित केलेले कृषी क्षेत्र, ना-विकास क्षेत्र, किंवा इतर कोणतेही विशेष क्षेत्र याचा अपवाद राहील. या क्षेत्रात अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकाची कमाल मर्यादा प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीनुसार लागू राहील.

iii. त्यानुसार संबंधित विशेष नियोजन प्राधिकरण हे प्रचलित विकास नियंत्रण नियमावली (DCRs), सर्वसमावेशक विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावली (DCPRs) व एकत्रिकृत विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावली (UDCPRs) मध्ये आवश्यक सुधारणा करतील.

iv. महाराष्ट्र राज्य-२०२३ च्या नवीन माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सक्षम सेवा धोरणानुसार, मूलभूत चटई क्षेत्र निर्देशांकाव्यतिरिक्त, आतिथ्य /पर्यटन घटकांसाठी अतिरिक्त मजल्यावरील जागेसाठी शुल्क अनुज्ञेय राहील.

### ख) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रासाठी:

बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील सर्व सार्वजनिक आणि खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यान / एव्हीजीसी पार्क प्रकल्पांना अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकाकरिता आकारावयाच्या प्रचलित अधिमूल्याचा जो प्रचलित दर विकास नियंत्रण नियमावली-2034 (DCPRs २०३४) च्या अनुषंगाने निश्चित करण्यात आला आहे, त्या दराच्या 50 टक्के दराने अधिमूल्य आकारणी करुन, अंतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय राहील.

**ग) उर्वरित राज्यासाठी:**

i. विदर्भ, मराठवाडा, धुळे, नागपूर, रत्नागिरी आणि सिंधुदूर्गमधील क्षेत्रामध्ये अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकांकरीता अधिमूल्य आकारले जाणार नाही.

ii. युनिफाइड डेव्हलपमेंट कंट्रोल अँड प्रमोशन रूल्स (यू. डी. सी. पी. आर.) आणि विशेष नियोजन प्राधिकरणाच्या डी. सी. आर. नुसार, (ख) आणि (ग) (i) व्यतिरिक्त इतर क्षेत्रांसाठी प्रचलित दराच्या ५० टक्के दराने हप्ते आकारून सर्व सार्वजनिक आणि खाजगी आतिथ्य उद्यानांसाठी अतिरिक्त एफ. एस. आय. ला परवानगी असेल.

**घ) मध्यवर्ती व्यापार केंद्र:**

प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीतील तरतूदींनुसार कोणत्याही नियोजन प्राधिकरणाने एखाद्या क्षेत्रास मध्यवर्ती व्यापार केंद्र घोषित केल्यास त्यामधील नोंदणीकृत सार्वजनिक आणि खाजगी आदरातिथ्य उद्योग; माहिती तंत्रज्ञान उद्योग/एव्हीजीसी उद्योग; यांना मध्यवर्ती व्यापार केंद्रासाठीच्या प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीमध्ये अधिमूल्याचा जो प्रचलित दर निश्चित केला आहे त्या प्रचलित दराच्या ५० टक्के दराने अधिमूल्य आकारणी करून अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय राहील.

**ङ)** या व्यतिरिक्त इतर अनुज्ञेय असलेले चटई क्षेत्र निर्देशांक जसे की, फंग्जीबल, अॅन्सीलरी चटई क्षेत्र निर्देशांक हे संबंधित स्थानिक विकास नियंत्रण नियमावलीतील(DCR/ UDCPR/ CDCPR)तरतुदींनुसार अनुज्ञेय राहील.

**च)** विकासकाला पर्यटन घटकासाठी वाढीव अतिरिक्त एफएसआयसाठी प्रीमियम, विकास शुल्क, सहायक शुल्क आणि इतर शुल्क भरण्याची परवानगी दिली जाईल.

**छ)** चटई क्षेत्र निर्देशांकामधून वगळण्यात आलेले पर्यटनाशी संबंधित घटक.

तळघरातील पार्किंग, साठवण आणि डिझेल जनरेटर (डी. जी.) संच बसवण्यासाठी वापरलेली जागा ही चटई क्षेत्र निर्देशांकात गणली जाणार नाही.

**१४.६.१२. इमारतींवरील शिथिल निर्बंध**

राष्ट्रीय इमारत संहितेच्या तरतुदींनुसार, पार्किंगचे निकष, मजल्याची उंची, मेट्रो, डी. जी. सेट्स, एफ. एस. आय. इत्यादी मार्गिकांमध्ये परवानगी असलेली आच्छादित बाल्कनी यासारख्या निकषांनुसार डी. सी. आर. मध्ये योग्य सुधारणा केल्या जातील.

**१४.६.१३. मनोरंजनाकरिता मजल्याची तरतूद**

१५ मीटरपेक्षा जास्त उंचीच्या हॉटेलच्या इमारतीच्या बाबतीत, खालील बाबींच्या अधीन राहून मनोरंजनात्मक मजल्याला परवानगी दिली जाऊ शकते –

i) अशा मजल्याची उंची ४.५ मीटरपर्यंत असेल आणि ती सर्व बाजूंनी उघडी असेल.

ii) अशा मजल्याचा वापर जलतरण तलाव बांधण्यासह मनोरंजनाच्या उद्देशाने/उपक्रमांसाठी केला जाईल आणि तो यू. डी. सी. पी. आर. नुसार आवश्यक असलेल्या मनोरंजनाच्या मोकळ्या जागेव्यतिरिक्त असेल.

iii) अशा एका मजल्याला प्रत्येक २० मीटर उंचीवर परवानगी दिली जाऊ शकते, तथापि, पहिल्या मजल्याला १५ मीटर उंचीनंतर परवानगी दिली जाऊ शकते.

iv) अशा मजल्याची गणना चटई क्षेत्र निर्देशांकामध्ये केली जाणार नाही, तथापि, कपडे बदलण्याची खोली, स्वच्छतागृह इ. सारख्या पूरक बांधकामांची गणना चटई क्षेत्र निर्देशांकामध्ये केली जाईल.

**१४.६.१४. मिश्र जमिनीचा विकास**

मिश्र जमिन वापर अनुज्ञेय असेल, तथापि अशा वापरातील पर्यटनाशी निगडीत घटक त्याखालील जमीन जे स्वमालकीचे व फक्त पर्यटन उद्देशासाठीच वापरले जातील अशा घटकांना फक्त या धोरणातील प्रोत्साहने अनुज्ञेय असतील. इतर घटक जे पर्यटनाशी संबंधित नाहीत जसे रहिवासी निवास संस्था, व्हिलेज किंवा लघु उद्योग त्यांना ही प्रोत्साहने लागू होणार नाहीत. तथापि असे पर्यटनाशी संबंधित नसलेले घटक व त्याखालील जमीन त्या प्रकल्प प्रवर्तक त्याची विक्री किंवा दीर्घ मुदतीने भाडेपट्याने देऊ शकतात.

**१४.६.१५. पर्यटन घटकांना देण्यात येणाऱ्या प्रोत्साहनांच्या मुदतवाढीसाठी सक्षम यंत्रणा:-**

नैसर्गिक आपत्ती, मानवी हस्तक्षेपाबाहेरील घटनांमुळे बाधित, राष्ट्रीय साथीचा प्रसार, इत्यादींमुळे बाधित झालेल्या पर्यटन घटकांना जास्तीत जास्त २ वर्षापर्यंत प्रोत्साहने अनुज्ञेय करण्याचे अधिकार हे मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील गठित केलेल्या उच्चस्तर समितीस राहतील.

## १५. धोरणाच्या अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे त्रिस्तरीय संस्थात्मक व प्रशासकीय यंत्रणा कार्यान्वित करण्यात येईल:-

**१५.१.** राज्यातील विशाल आणि अति विशाल मेगा पर्यटन प्रकल्पांना मंजुरी देणे व पर्यटन धोरणात नमूद नसलेल्या विवक्षित बाबींवर निर्णय घेण्याचे अधिकार हे मा.मुख्य सचिवांच्या गठित उच्चाधिकार समितीस असतील.

**१५.२.** महाराष्ट्र पर्यटन धोरण-२०२४ च्या अंमलबजावणीसाठी आणि राज्यात गुंतवणूक सुलभ करण्यासाठी प्रधान सचिव / सचिव (पर्यटन) यांच्या अध्यक्षतेखाली एक सुकाणू समिती गठित करण्यात येईल.

**१५.३.** या धोरणाची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी पर्यटन संचालनालयाची असेल आणि आवश्यकतेनुसार धोरणाच्या परिणामकारक अंमलबजावणीसाठी कार्यालयीन मार्गदर्शक तत्त्वे / कार्यपद्धती पर्यटन संचालनालय वेळोवेळी निश्चित करेल.

**१५.४.** या धोरणात नमूद केलेल्या सर्व बाबी / घटकांच्या अंमलबजावणीसाठी पर्यटन संचालनालयालाखाली नमूद केलेले मनुष्यबळ शासनाच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार बाह्य स्त्रोत यंत्रणेद्वारे पर्यटन संचालनालयात / प्रादेशिक कार्यालयात / पर्यटन विभागात नियुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No | Particulars | Consultants/ Experts/ Architects/ Engineer at HQ + Divisional offices | Project Officers at HQ + Divisional offices | Data Analyst at HQ/ Divisional offices | Tourism Expert at HQ / Divisional offices | Law Officer at HQ/ Divisional Office |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Providing Fiscal incentives under Tourism Policy 2024 | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 2 | 12 | 3 |
| 2 | Supporting in organizing Rural Tourism Competition | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 2 | | |
| 3 | Supporting in organizing Tourism Excellence Awards | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 2 | | |
| 4 | Implementation of MAHA Destination Program | 6 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 2 | | |
| 5 | Undertaking branding and promotions | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 7 (Divisional Offices – 6, HQ – 1) | 2 | | |

**१५.५.** वरील नियुक्त्यांसाठी/ मनुष्यबळासाठी शासनाद्वारे आवश्यक ते वित्तीय सहाय्य पर्यटन संचालनालयाला करण्यात येईल.

**१५.६.** पर्यटन स्थळावरील पर्यटकांना समुपदेशन करणे, पर्यटन स्थळाबाबत माहिती पुरविणे, पर्यटन स्थळाच्या संवर्धनासाठी / स्वच्छतेसाठी मार्गदर्शन करणे, पर्यटन स्थळावरील अवैध कारवाई, स्थळावरील शांतता भंग करणे, शासनाच्या नियमांचे उल्लंघन करणे अशा घटकांबाबत संबंधित पोलीस यंत्रणा / जिल्हा प्रशासन इत्यादींना सूचित करणे यासाठी पर्यटन मित्र यांची तात्पुरत्या स्वरूपात बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत नियुक्ती करण्यात येईल.

**१५.७.** पर्यटन संचालनालय (**DoT**) धोरणाच्या अंमलबजावणीसाठी, **MAHA** डेस्टिनेशन प्रोग्राम, ग्रामीण पर्यटन आणि पर्यटन उत्कृष्टता पुरस्कार, डेटा संशोधन व विश्लेषण कक्ष, गुंतवणूक सुविधा कक्ष इ. स्थापन / अंमलबजावणी करेल.

**१६.** या धोरणातील घटकांना प्रोत्साहान देण्यासाठी प्रती वर्षी रुपये १६६६.०० कोटी इतक्या वित्तीय भारास मान्यता देत आहे.

**१७.** पर्यटन धोरण २०२४ मराठी भाषेतील तरतुदींच्या अर्थ विवरणासाठी इंग्रजी भाषेतील तरतुदी विचारात घेण्यात याव्यात.

**१८.** पर्यटन धोरण २०२४ च्या मराठी भाषेतील तरतुदींचे अर्थ विवरण करण्याचा अधिकार शासनास असेल व तो अंतिम समजण्यात येईल.

**१९.** सदरचा शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१११/१४४४, दि.१९.०४.२०२४ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक क्र. ७९८/व्यय-१५, दि.१२.०६.२०२४अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने तसेच दि.०५.०७.२०२४ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीतील झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**२०.** प्रस्तुत शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७१८१४२९२२९८२३ असा असून सदरचा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayashree Shrikant Bhoj

Digitally signed by Jayashree Shrikant Bhoj
DN: c=IN, o=Personal, title=1716, pseudonym=9EECB0877A3C7DB2B64033A87F8395F803FDA3EC, 2.5.4.20=0119735bbe1c887fa0d0f2dbe3c22dc5dca429f5fda21a6632a211acb8375568, postalCode=400021, st=Maharashtra, serialNumber=EDB71466D6F30EFD234296DA10D1852551B060636BC44A66D8AD6C3DBECFAB29, cn=Jayashree Shrikant Bhoj
Date: 2024.07.18 15:35:01 +05'30'

**(जयश्री भोज)**
**सचिव (पर्यटन), महाराष्ट्र शासन**

प्रति ,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. मा. उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
१०. मा.संसद सदस्य (महाराष्ट्र राज्यातील)
११. मा.विधानसभा सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई
१२. मा.विधानपरिषद सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई
१३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१६. संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महामसंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१९. विक्रीकर/वस्तु व सेवा कर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०. उद्योग आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
२२. सर्व जिल्हाधिकारी
२३. निवडनस्ती, पर्यटन-४

****

# परिशिष्ट अ

## MAHA Special Destination Development Program
## महा विशेष पर्यटन स्थळ विकास कार्यक्रम (अ.क्र. 12)

### 1. Implementation Agency

The project proposal can be initiated by the District Collector who will develop the project proposal and submit to Directorate of Tourism (DoT) through the Deputy Director at regional level.

The Directorate of Tourism while taking up implementation will:

(i) Ensure technical, financial and administrative compliance of the guidelines and other terms and conditions of the sanction of the project.
(ii) Follow all codal formalities, while awarding contracts for works or procurement of goods and services for the project. Ensure full compliance with all codal formalities regarding finance and accounts of the project.
(iii) Ensure complete transparency in its transaction and mandatorily follow E-tendering for all tenders.
(iv) Shall mandatorily maintain the requisite documents and periodic physical and financial progress of the projects on the portal set up for the Program.

### 2. Project Development and Management Consultants

The districts will be provided end-to-end support for project design, development, implementation and management through Project Development and Management Consultants (PDMCs). The Directorate of Tourism shall empanel Consultants / Architects which can be utilised to provide end-to-end support to the Implementing Agency for the above-mentioned services.

### 3. Selection of destinations based on District Perspective Plan

The project proposals shall be based on destination centric approach wherein the interventions shall be proposed keeping in view a holistic development of destination with respect to tourism as well as related civic amenities.

The Implementation Agency can select destinations for development under the Program after thoroughly analysing the tourism potential based on the following parameters:

(i) Major tourism attractions, offerings and themes
(ii) Connectivity by Air, Rail and Road including local travel
(iii) Connectivity to any tourist circuit
(iv) Current tourism eco system at the destination
(v) Future tourism potential at the destination
(vi) State / District support for the destination

### 4. List of non-admissible project components

The following is the list of non-admissible components, which will not be funded under the Program by the Department. In case required, these components will have to be funded by the

other Central, State Government or sources other than MAHA Destination Development Program:

(i) Land acquisition for development
(ii) Resettlement and rehabilitation package
(iii) Improvement/ investments in assets/structures owned by private entities.
(iv) Rejuvenation/dredging/development of bunds of a water body (man-made & natural both)

## 5. **Preparation of Detailed Project Report (DPR) for each destination**

The Detailed Project Report (DPR) shall be prepared for each destination keeping in view the following:

(i) Benchmarking and gap analysis with respect to carrying capacity, tourism infrastructure, activities, connectivity, skill development, safety, marketing and promotion.
(ii) Proposed hard and soft interventions.
(iii) Pre-construction clearances
(iv) O&M proposals

The Hard and Soft interventions would include:

❖ **Infrastructure /Hard Interventions**

(i) Tourism Core Products
(ii) Tourism Activities
(iii) Health, Safety and Sanitation
(iv) Site Infrastructure
(v) Circulation and Traffic.

❖ **Soft Interventions**

(i) Tourist Services
(ii) Marketing and Promotion
(iii) Capacity Building
(iv) Digitization/ GIS Mapping

A workshop of relevant stakeholders should be held to seek feedback and suggestions regarding the felt needs of the tourists, gaps and priorities for development of destination, sustainability, community participation and promotion.

It should be ensured that various stakeholders and local community representatives are consulted while preparing DPR. The feedback and suggestions should be suitably incorporated in the DPR.

The Implementing Agency shall also procure all the relevant clearances, which may be required for the project under any applicable law or any other administrative provision to avoid delays during implementation. All clearances shall be mandatory be part of the DPR.

## 6. **Approval of DPR**

The DPRs will be processed by the Directorate of Tourism (DoT) for approval by State Sanctioning and Monitoring Committee (SSMC). In case the SSMC imposes any changes in the

DPR, while approving the project, District Administration will submit the revised final DPR. Subsequent to the receipt of Final DPR, DoT would release the sanction order for the project.

## 7. Revisions and Modifications of sanctioned DPR

The appointed Contractor (PDMC) on behalf of DoT has to implement the project for each destination as per the approved DPR and Program guidelines. In case of any changes in the project or revisions from the approved DPR, the Collectorate will seek approval of the Directorate of Tourism (DoT) before commencing work on the envisaged change. The Directorate of Tourism (DoT) will seek approval of State Sanctioning and Monitoring Committee (SSMC) or any other competent authority.

## 8. Funding

The Program is 100% state funded. The funds shall be sanctioned by the Directorate of Tourism as per the guidelines of the Program and in conformity with the applicable Financial Rules and the directions issued by the Government of Maharashtra from time to time.

## 9. Budget and administrative funding

The Budget for the MAHA Destination Development Program would be as per any new budgetary allocation by the State Government and/or earmarked from the funds assigned to the Regional Tourism Development Scheme (RTDS).

**A. 3% funds for Professional, Administrative and Office Expenses by DoT at State level**

The fund will be utilized at the Directorate level for:

**(i)** Hiring of State Program Management Unit
**(ii)** Fees for State Technical Nodal Agency, if any
**(iii)** Administrative expenditure on Directorate activities including state level and regional review meetings, workshops and field visits etc.
**(iv)** Capacity building through State Resource Centres/COE for various themes identified under the Program:
- **a)** IEC material for capacity building
- **b)** State & regional workshops for capacity building
- **c)** Giving awards and recognition of best practices
- **d)** Up-scaling and replication of best practices and smart solutions
- **e)** Research and applied studies.
- **f)** International cooperation for capacity building and technology development.

**(v)** Setting up IT portal
**(vi)** The Steering Committee will decide on the use of these funds for any other purpose.

**B. 5% funds for Professional, Administrative and Office Expenses at Destination level**

The amount will be utilized by the Directorate for Destination level activities for the following purpose:

**(i)** Hiring of Project Development and Management Consultants (PDMC), other professionals and support teams on contract to support the implementation of Mission at

destination levels will be permissible as set out in the guidelines and after following fair and transparent procedures.

**(ii)** Institutional arrangements that support Mission implementation will be eligible to be funded

**(iii)** It shall not be used for purchase of vehicles, construction and maintenance of buildings, creation of posts, payment of salary of existing staff and purchase of furniture and fixtures, etc.

## 10. Institutional Framework

In order to ensure the successful implementation of the Program, it is important that the governance structure of the Program is well laid out and roles and responsibilities of different entities are clearly defined. The following institutional framework will govern the implementation of the Program at State level with the following composition and roles and responsibilities:

**A.** State Sanctioning and Monitoring Committee (SSMC)
**B.** Directorate of Tourism (DoT)
**C.** Destination Management Committee (DMC)
**D.** Destination Management Organization (DMO)
**E.** State level Program Management Unit (SLPMU)
**F.** Project Development and Management Consultant (PDMC)

### A) State Sanctioning and Monitoring Committee (SSMC)

The State Sanctioning and Monitoring Committee (SSMC) will be chaired by the Secretary, Department of Tourism and will consist of the following members.

| | | |
|---|---|---|
| **1** | Secretary, Department of Tourism, Govt. of Maharashtra | Chairperson |
| **2** | Secretary, Culture Department, Govt. of Maharashtra | Member |
| **3** | Secretary, Urban Development, Govt. of Maharashtra | Member |
| **4** | Secretary, Civil Aviation, Govt. of Maharashtra | Member |
| **5** | Secretary, Skill Development, Govt. of Maharashtra | Member |
| **6** | Secretary, PWD, Govt. of Maharashtra | Member |
| **7** | Secretary, Environment & Forest, Govt. of Maharashtra | Member |
| **8** | Director, Directorate of Tourism, Govt. of Maharashtra | Member |
| **9** | Representative of Tourism and Hospitality Industry | Member |
| **10** | Joint Director, Directorate of Tourism, Govt. of Maharashtra | Member Secretary |
| The Departments shall not depute representative below the rank of Joint Secretary / Director/ Deputy Secretary. The Chairperson may invite representatives from any other Department or organization as special invitee. | | |

